**अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील प्रकरण ५ प्रमाणे अपंग विद्यार्थ्यांना उपलब्ध केलेल्या शिक्षणविषयक सुविधांचे मुल्यमापन/ परीक्षण करण्यासाठी जिल्हास्तरीय समितीची स्थापना.**

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन परिपत्रक क्र.अपंग २००३/प्र.क्र.२२२/सुधार-३,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०००३२
दिनांक: २७ जानेवारी,२००४.

**शासन परिपत्रक:-** अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ याची अंमलबजावणी राज्यात करण्यासाठी त्या अधिनियमांतर्गत विविध कलमांखालील तरतूदीनुसार कार्यवाही करणे आवश्यक आहे. यासाठी महाराष्ट्र शासनाने अपंगकल्याण कृति आराखडा २००१ तयार केला आहे. सदरहू अधिनियमातील प्रकरण ५, कलम २६ ते ३१ व कलम ३९ मध्ये अपंग विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी विविध उपाययोजना व सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत खालीलप्रमाणे निर्देश आहेत:-

१) प्रत्येक अपंग मुलाला वयाच्या १८ वर्षापर्यंत मोफत शिक्षण देण्यात येईल.
२) अपंग विद्यार्थ्यांना एकात्मिक शिक्षणासाठी प्रोत्साहित करण्यात येईल.
३) शासकीय व अशासकीय क्षेत्रांना प्रोत्साहन देऊन अपंग विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी विशेष शाळा स्थापन करणे व त्यामध्ये व्यवसाय शिक्षण देण्याची सोय करणे.
४) अपंग विद्यार्थ्यांना प्राथमिक शिक्षणानंतरचे शिक्षण पूर्ण करता आले नसल्यास त्यासाठी अंशकालिन वर्गाची व्यवस्था करणे.
५) १६ वर्षाच्या पुढील अपंग विद्यार्थ्यांना कामचलाऊ शिक्षण देण्यासाठी अर्धवेळ शिक्षणाची व्यवस्था करणे.
६) ग्रामिण भागातील मनुष्यबळाचा वापर करुन अपंग व्यक्तींना अनौपचारिक शिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे.
७) मुक्त शाळा / मुक्त विद्यापीठाच्या माध्यमातून शिक्षण देणे.
८) इलेक्ट्रॉनिक्स् माध्यमाचा अपंग विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी उपयोग करणे.
९) प्रत्येक अपंग मुलाला मोफत पुस्तके व शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन देणे.
१०) अपंगांच्या शिक्षणाच्या संदर्भात संशोधन करण्यासाठी स्वयसेवी संस्था, शासकीय संस्था व अन्य माध्यमातून नवीन शिक्षण पध्दती अंमलात आणणे व त्यासाठी [illegible]

११) राष्ट्रीय पातळीवर कार्यरत असलेल्या संस्थांना पूरक अशी शिक्षक प्रशिक्षण संस्था स्थापन करुन विशेष शाळा व एकात्मिक शिक्षण यूनिटसाठी विशेष शिक्षक उपलब्ध करुन देणे.
१२) अपंग विद्यार्थ्यांना शालेय शिक्षणासाठी प्रवास सवलत अथवा त्यांच्या पालकांना पर्यायी सुविधा पुरविणे.
१३) शाळा / महाविद्यालये / व्यवसाय शिक्षण देणाऱ्या संस्था यामध्ये अपंग विद्यार्थ्यांना सहज वावरता यावे यासाठी अडथळा मुक्त वातावरण निर्माण करणे.
१४) शालेय शिक्षण घेणाऱ्या अपंग विद्यार्थ्यांना पुस्तके, गणवेश व इतर साहित्य पुरविणे.
१५) अपंग मुलांच्या पालकांच्या तक्रारीचे निवारण करण्याकरीता स्वतंत्र मंचाची स्थापना करणे.
१६) अपंग विद्यार्थ्यांना शैक्षणिक शिष्यवृत्ती देणे.
१७) अपंग विद्यार्थ्यांसाठी परीक्षा पध्दतीमध्ये आवश्यक ते फेरबदल करणे. विशेषतः अंध व अंशतः अंध विद्यार्थ्यांना गणिताऐवजी पर्याय देण्याची व्यवस्था करणे.
१८) प्रत्येक अपंग प्रवर्गाच्या विद्यार्थ्यानुरुप सुसंगत असे अभ्यासक्रमात फेरबदल करणे.
१९) कर्णबधिरांकरीता अभ्यासक्रमात फेरबदल करुन एकाच भाषेचा वापर करण्याकरीता अभ्यासक्रमात योग्य तो बदल करणे.
२०) अंध व कमी दृष्टी असलेल्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक संस्थांमध्ये लेखनीक मदतनीसाची सोय करणे.
२१) शासकीय तसेच शासनाकडून अनुदान घेणाऱ्या सर्व शैक्षणिक संस्थांमध्ये अपंगांसाठी ३% जागा राखीव ठेवणे.

२. अपंग विद्यार्थ्यांना वरील सुविधा उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी शासनाची आहे. व या जबाबदरीची पूर्तता करण्याच्या दृष्टीने व अधिनियमातील तरतूदींचा अपंग विद्यार्थ्यांना फायदा मिळावा त्यादृष्टीने प्रत्येक जिल्हयात राबविण्यात येणाऱ्या वरील कार्यक्रमाची तपासणी होणे आवश्यक आहे. यासाठी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या अधिकारात खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करावी.

| | | |
|---|---|---|
| १) | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २) | शिक्षणाधिकारी (प्राथमिक) | सदस्य |
| ३) | शिक्षणाधिकारी (माध्यमिक) | सदस्य |
| ४) | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी | सदस्य |
| ५) | महानगरपालिकेतील शिक्षण मंडळाचा शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) | सदस्य |
| ६) | अंध / अस्थिव्यंग / मूकबधिर / मतिमंद यांचे प्रतिनिधी अथवा अपंग क्षेत्रात काम करणाऱ्या नामवंत संस्थांचे प्रतिनिधी अथवा त्या क्षेत्रात काम करणाऱ्या प्रतिथयश व्यक्ती.(एकूण ४)) | सदस्य |
| ७) | समाजकल्याण अधिकारी (गट-अ) जिल्हा परिषद | सदस्य-सचिव |

....३/-

३. सदर समितीने शासकीय व अशासकीय अनुदानित शाळा/महाविद्यालये/आश्रमशाळा आदि शैक्षणिक उपक्रमांना भेटी देऊन त्या उपक्रमांकडून अधिनियमांतील तरतूदींची अंमलबजावणी योग्य प्रकारे होते किंवा कसे याची तपासणी करुन परिपत्रकांत नमूद केलेल्या सुविधा अपंग विद्यार्थ्यांना उपलब्ध करुन देण्यांत आल्या आहेत किंवा कसे याचे परिक्षण करुन विहित तपासणी नमुन्यात त्याबाबतचा अहवाल तसेच करावयाच्या उपाययोजनेबाबतचा अहवाल आयुक्त, अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचेकडे तसेच शासनास मार्च अखेर सादर करावा.

४. समितीवरील अशासकीय सदस्यांना कोणताही दैनिक भत्ता अथवा बैठक भत्ता/प्रवास भत्ता अनुज्ञेय नाही. मात्र समितीवरील ज्या शासकीय अधिका-यांना वाहन देण्यांत आलेले आहे अशा अधिका-यांनी अशासकीय सदस्यांना आपल्या वाहनात दौ-यांचेवेळी समाविष्ट करुन घ्यावे. समितीने या प्रयोजनार्थ संबंधित जिल्हयांतील स्वयंसेवी संस्थांचा सहभाग घ्यावा. या तपासणीसाठी आवश्यक असणारे तपासणी नमुना प्रपत्र आयुक्त, अपंग कल्याण,पूणे यांनी सर्व संबंधित जिल्हयाच्या समित्यांना उपलब्ध करुन द्यावे.

५. हे परिपत्रक शालेय शिक्षण विभाग तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे सल्लामसलत करुन त्यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

27.1.04

( डॉ. मुन्शीलाल गौतम )
प्रधान सचिव, सामाजिक न्याय.

प्रति:
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
आयुक्त, अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती,सुधार-३

एच–1057(200–1–04)2.